**विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभागाकरीता पदांची निर्मिती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आस्थाप्र-२०१७/प्र.क्र.१९७ /आस्था-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२
दिनांक : ०९ जून २०१७

**संदर्भ** : सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना क्र.शाकानि.२०१७/ प्र.क्र.३३/१८ (र.व का.) दि.०९/०३/२०१७.

**प्रस्तावना :-**

विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग यांच्या आर्थिक, सामाजिक व शैक्षणिक विकासासाठी विविध योजना राबविण्यात येतात. या योजनांची प्रभाविपणे अंमलबजावणी होण्यासाठी व त्या प्रवर्गाला न्याय मिळण्यासाठी नवीन स्वतंत्र विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग स्थापन करण्यास व सदर विभागास स्वतंत्र सचिव व तद्नुषंगिक अधिकारी व कर्मचारी वृंद मिळून ५१ पदे उच्चाधिकार समितीच्या मान्यतेने नव्याने निर्माण करण्यास दि.१७/१२/२०१६ रोजीच्या मा.मंत्रिमंडळाच्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. त्या अनुषंगाने सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना क्र.शाकानि.२०१७/प्र.क्र.३३/१८ (र.व का.), दि.०९/०३/२०१७ अन्वये विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभागाची निर्मिती करण्यात आलेली आहे. या विभागासाठी नवीन पदांना मान्यता देण्यासाठीचा प्रस्ताव उच्चाधिकार समितीकडे सादर करण्यात आला असता, सदर समितीने चक्रीय पध्दतीने प्रथम टप्प्यात सचिव-१, व अधिकारी/कर्मचारी-२९ अशी एकूण ३० पदे निर्माण करण्यास मान्यता दिलेली आहे. त्या अनुषंगाने विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभागासाठी ३० पदांच्या पद निर्मितीचे आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग या नव्याने निर्माण करण्यात आलेल्या विभागासाठी खालीलप्रमाणे ३० पदे निर्माण करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | सचिव | ३७४००-६७००० (१०००००) | १ |
| २ | सह/उप सचिव | १५६००-३९१०० (७६००) | १ |
| ३ | अवर सचिव | १५६००-३९१०० (६६००) | २ |
| ४ | कक्ष अधिकारी | ९३००-३४८०० (४८००) | ५ |
| ५ | सहायक कक्ष अधिकारी | ९३००-३४८०० (४३००) | ६ |
| ६ | लिपिक-टंकलेखक | ५२००-२०२०० (१९००) | ७ |
| ७ | उच्चश्रेणी लघुलेखक | ९३००-३४८०० (४४००) | २ |
| ८ | निम्नश्रेणी लघुलेखक | ९३००-३४८०० (४३००) | १ |
| ९ | शिपाई | ४४४०-७४४० (१३००) | ५ |
| | एकूण | | ३० |

उपरोक्त नमूद पदांपैकी सचिव हे पद वगळता इतर २९ अधिकारी/कर्मचारी वृंदाची पदे सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागातून हस्तांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. "सचिव" या नव्याने निर्माण होणाऱ्या पदाच्या निर्मितीची आवश्यक कार्यवाही सामान्य प्रशासन विभागाने करावी.

३. सदर नव्याने निर्माण झालेल्या विभागासाठी स्वतंत्र लेखाशिर्ष देण्याबाबतची कार्यवाही सुरू आहे. सबब, सद्यस्थितीत याबाबत होणारा खर्च मागणी क्रमांक एन-२, २२५१-सेक्रेटरीएट(०१) (०१) सामाजिक न्याय व विशेश सहाय्य विभाग (२२५१ ०११ ३) अनिवार्य दत्तमत-०१- वेतन या लेखाशिर्षाखाली मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदरचा शासन निर्णय, उच्चाधिकार समितीच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२६९/आपुक, दि.०६/६/२०१७ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थाळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१७०६०९१७३५३४८५२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a19e16d10b98348341561863c7561e9fc35bb428cdc3ea443c0263495f76285a, serialNumber=0a540933faf44a550ca357b423fa83e6fdce81a4746d167dae68daa29726d41d, cn=Dnyandev Laxman Sul
Date: 2017.06.09 17:32:29 +05'30'

**(ज्ञा.ल.सुळ)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार लि, मुंबई,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई,
५) सर्व मा.संसद सदस्य, /मा. विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,
६) मा.मुख्य सचिव यांचे सह/उप सचिव, मंत्रालय, मुंबई,
७) सर्व मंत्रालयीन विभागांचे अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
८) सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना),
९) *प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
१०) *प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
११) *प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१२) *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१३) *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा) मुंबई,
१४) *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद) मुंबई,
१५) *राज्य निवडणूक आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकिय भवन, मुंबई
१६) *सचिव, राज्य माहिती आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
१७) *महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर

१८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई /पुणे,
२०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई /पुणे,
२१) कोषागार अधिकारी, मुंबई /पुणे
२२) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महारसंचालनालय, मुंबई (प्रसिध्दीकरिता ५ प्रती)
२३) सर्व विभागीय आयुक्त
२४) सर्व जिल्हाधिकरी
२५) अध्यक्ष राज्य मागासवर्ग आयोग,
२६) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,
२७) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२८) आयुक्त, समाजकल्याण, पुणे
२९) आयुक्त, अपंग कल्याण, पुणे
३०) संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण, पुणे
३१) सर्व प्रादेशिक उपसंचालक, समाजकल्याण / विजाभजइमाव व विमाप्र कल्याण,
३२) सर्व सहाय्यक संचालक, समाजकल्याण / विजाभजइमाव व विमाप्र कल्याण,
३३) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथलय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई ४०० ०३२ (१० प्रती)
३४) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरॅक नं.१ योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईट, मुंबई २० (५ प्रती)
३५) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई-४ (५ प्रती)
३६) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई १३ (५ प्रती)
३७) इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५ (५ प्रती)
३८) नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईट, मुंबई २१ (५ प्रती)
३९) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८ (५ प्रती)
४०) महाराष्ट्र नवनिर्माण सेना, कृष्णकुंज, एम.बी.राऊत रोड, शिवाजी पार्क, दादर, मुंबई ४०० ०२५ (५ प्रती)
४१) सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख,
४२) अवर सचिव/का.१०, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४३) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
४४) निवडनस्ती.

(* - पत्राव्दारे)